**शैक्षणिक वर्ष २०१७-१८ पासून राज्यातील विद्यमान संस्थेतील व्यावसायिक पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रम पुनःश्च सुरू करण्यास अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषद ,नवी दिल्ली यांनी दिलेल्या मान्यतेच्या अनुषंगाने मान्यता देण्याबाबत ......**

**पद्मभूषण वसंतदादा पाटील प्रतिष्ठानचे कॉलेज ऑफ इंजिनिअरींग, सायन, मुंबई.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्र. टीईएम-२०१७/प्र.क्र.२०९/तांशि-४**

मंत्रालय विस्तार भवन, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: १५ मे, २०१७

**संदर्भ :** १) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्र.टीईएम-२०१४/प्र.क्र.१२९/तांशि-४, दि.०४.०८.२०१४

२) अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.वेस्टर्न/१-३३४४३२६०१६/ २०१७/EOA, दि.१०.०४.२०१७

३) संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य,मुंबई यांचे पत्र क्र.२/एनजीसी/मान्यता/ २०१७/ ५२२, दिनांक २६.०४.२०१७

**प्रस्तावना :**

उपरोक्त संदर्भाधीन-१ येथील शासन निर्णयासोबतच्या Annexure A नुसार, अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, नवी दिल्ली यांनी पद्मभूषण वसंतदादा पाटील प्रतिष्ठानचे कॉलेज ऑफ इंजिनिअरींग, सायन, मुंबई या संस्थेस No Admission कॅटेगरीमध्ये ठेवल्याने, शैक्षणिक वर्ष २०१४-१५ पासून सदर संस्थेतील कॉम्प्युटर इंजिनिअरींग व इलेक्ट्रॉनिक्स ॲन्ड टेलिकम्युनिकेशन इंजिनिअरींग या पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रमांची शासन मान्यता रद्द करण्यात आली होती. तथापि, संदर्भाधीन- २ येथील पत्रान्वये अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, नवी दिल्ली यांचेकडून सदर संस्थेतील कॉम्प्युटर इंजिनिअरींग व इलेक्ट्रॉनिक्स ॲन्ड टेलिकम्युनिकेशन इंजिनिअरींग या पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रमांना प्रत्येकी २४ प्रवेश क्षमतेसह शैक्षणिक वर्ष २०१७-१८ करिता मुदतवाढ (Extension of Approval) प्राप्त झाली आहे. त्यानुषंगाने संचालक, तंत्र शिक्षण यांनी उपरोक्त संदर्भाधीन-३ येथील पत्रान्वये प्रस्तावित केल्यानुसार, संदर्भाधीन-१ येथील दि.०४.०८.२०१४ रोजीच्या शासन निर्णयासोबतच्या Annexure A मधील अनुक्रमांक २४ व २५ येथील अनुक्रमे इलेक्ट्रॉनिक्स ॲन्ड टेलिकम्युनिकेशन इंजिनिअरींग व कॉम्प्युटर इंजिनिअरींग या पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रमांची शासन मान्यता रद्द केल्याचे आदेश रद्द करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

उपरोक्त संदर्भाधीन-२ येथील पत्रान्वये अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, नवी दिल्ली यांनी दिलेल्या मुदतवाढीस (Extension of Approval) अनुसरुन संदर्भाधीन-३ अन्वये संचालक, तंत्र शिक्षण यांनी सादर केलेल्या प्रस्तावानुसार पद्मभूषण वसंतदादा पाटील प्रतिष्ठानचे कॉलेज ऑफ इंजिनिअरींग, सायन, मुंबई या संस्थेतील संदर्भाधीन-१ येथील शासन निर्णयासोबतच्या Annexure A मधील अनुक्रमांक २४ व २५ येथील अनुक्रमे इलेक्ट्रॉनिक्स ॲन्ड टेलिकम्युनिकेशन इंजिनिअरींग व कॉम्प्युटर इंजिनिअरींग या पदव्युत्तर पदवी अभ्यासक्रमांची शासन मान्यता रद्द केल्याचे आदेश रद्द करण्यात येत असून शैक्षणिक वर्ष २०१७-१८ पासून सदरहू दोन अभ्यासक्रम २४ प्रवेशक्षमतेसह पुन:श्च सुरू करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

२. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१७०५१५१२१७४००८०८ असा आहे. सदर शासन निर्णय हा डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Dr.Kiran Patil Digitally signed by Dr.Kiran Patil Date: 2017.05.16 14:11:42 +05'30'

**( डॉ.किरण पाटील )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. सहसंचालक, तंत्र शिक्षण विभागीय कार्यालय, मुंबई
३. संचालक, महाविद्यालय व विद्यापीठ विकास मंडळ , मुंबई विद्यापीठ, फोर्ट, मुंबई
४. प्राचार्य, पद्मभूषण वसंतदादा पाटील प्रतिष्ठानचे कॉलेज ऑफ इंजिनिअरींग, सायन-चुनाभट्टी, मुंबई -४०० ०२२
५. सदस्य सचिव, अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, ७ वा मजला, चंद्रलोक बिल्डींग, जनपथ, नवी दिल्ली-११० ००१
६. विभागीय अधिकारी, अखिल भारतीय तंत्र शिक्षण परिषद, पश्चिम विभागीय कार्यालय, इंडस्ट्रियल इन्शुरन्स बिल्डींग, २ रा मजला, चर्चगेट, मुंबई
७. निवड नस्ती/तांशि-४.